महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमाच्या कलम
१२५ अन्वये करण्यात येणा-या  ठोक
करारासंदर्भात मार्गदर्शन

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः व्ही.पी.एम-२६१४/प्र.क्र.२६२/पंरा-४

बांधकाम भवन,२५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २२ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमाच्या कलम १२५ नुसार पंचायतींनी  बसविलेल्या करांऐवजी कारखान्यांनी ठोक रक्कमेच्या स्वरुपात अंशदान देण्याची तरतूद आहे. त्यानुसार ग्रामपंचायतींच्या हद्दीत पंचायत ज्या सुखसोयी पुरविते त्या सर्व किंवा त्यापैकी कोणत्याही सुखसोयी कारखान्यांच्या क्षेत्रात कारखान्यांकडून पुरविण्यात येतात. ही गोष्ट लक्षात घेऊन पंचायतीने बसविलेल्या सर्व किंवा त्यापैकी कोणत्याही करांच्या ऐवजी ठोक रक्कमेच्या स्वरुपात अंशदान स्विकारण्यासाठी पंचायतीला राज्य सरकारच्या मंजुरीने कोणत्याही कारखान्याशी करार करता येतो. ज्या ठिकाणी असा करार होऊ शकत नाही तेथे ती बाब विहित केलेल्या रितीने राज्य सरकारकडे निर्णयासाठी पाठवता येते आणि संबंधित पंचायतीला व कारखान्याला आपले म्हणणे ऐकण्याची संधी दिल्यानंतर राज्य सरकारला अशा अंशदानाची रक्कम ठरविता येते राज्य सरकारचा निर्णय संबंधित पंचायत व कारखाना यांच्यावर बंधनकारक आहे. शासनाचे हे अधिकार शासन अधिसूचना क्र.२६०१/प्र.क्र.१४९२/२२ दिनांक १९ मार्च, २००१ अन्वये विभागीय आयुक्त यांना प्रदान करण्यात आले आहेत. तसेच महाराष्ट्र ग्रामपंचायत (कारखान्यांनी कराऐवजी ठोक रक्कमेच्या स्वरुपात अंशदान देण्याबाबत) नियम, १९६१ अन्वये ठोक रक्कमेच्या स्वरुपात अंशदान देण्याबाबत कार्यवाही करणे आवश्यक आहे.

लोकलेखा समितीसमोर साखर कारखाने इत्यादीवर मालमत्ता करासंदर्भातील मा.प्रधान सचिव यांची साक्ष झाली असता असे निदर्शनास आले की, ग्रामपंचायती विहित वेळेत कर आकारणी करत नाहीत. त्याचप्रमाणे कराचे मागणी बिल देखील बजावत नाहीत. काही प्रकरणी कर आकारणीसाठी संबंधित कारखान्यांनी बांधकाम केलेल्या व मोकळया जागेचे क्षेत्रफळ ग्रामपंचायतीस कळविले नसल्याने ग्रामपंचायतीस त्या कारखान्यावर कर आकारणी करता आली नाही. करासंदर्भातील अपिलीय प्राधिकारी यांचेकडे दाखल होणा-या अपिलांच्या सुनावणी दरम्यान असेही निदर्शनास आले आहे की, काही ग्रामपंचायती आपल्याच स्तरावर त्यांच्या हद्दीतील कारखान्यांबरोबर महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमाच्या कलम १२५ अन्वये ठोक करार करतात. मात्र महाराष्ट्र

ग्रामपंचायत (कारखान्यांना कराऐवजी ठोक रक्कमेच्या स्वरुपात अंशदान देण्याबाबत) नियम, १९६१ मधील तरतुदीस अनुसरुन अशा करारास शासन प्राधिकृत विभागीय आयुक्त यांची मान्यता घेत नाहीत. त्यामुळे विभागीय आयुक्तांची मान्यता न घेतल्याने असे करार अवैध ठरतात. असे करार नियमित न झाल्याने न्यायालयीन प्रकरणात वाढ होते व प्रकरणे न्यायप्रविष्ट राहिल्याने न्यायनिर्णय होईपर्यंत काही प्रकरणांमध्ये ग्रामपंचायतीला ब-याच कालावधीपर्यंत करापासून वंचित रहावे लागते.

## शासन परिपत्रक -

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना असे सूचित करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्याखालील ग्रामपंचायतींनी महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमातील कलम १२५ अन्वये ठोक करार करताना खालीलप्रमाणे कार्यवाही केली आहे काय याची खातरजमा करावी.

प्रत्येक ग्रामपंचायतीच्या हद्दीतील कारखान्यांची यादी तयार करुन ठोक करारासंदर्भातील संबंधित कारखान्यांनी वित्तीय वर्ष सुरु झाल्यापासून किंवा कोणत्याही वित्तीय वर्षात कारखान्याचे काम सुरु झाल्यापासून ६० दिवसाचे आत पंचायतीकडे लेखी अर्ज केला आहे का, अर्ज मिळाल्यापासून ६० दिवसांच्या आत पंचायतींनी भोगवटा करणा-या इसमास त्यांचा निर्णय कळविणारा ठराव संमत केला आहे का, भोगवटा करणा-या इसमाकडून ठरविण्यात आलेली ठोक रक्कम स्विकारण्यास पंचायत कबूल होईल त्याबाबतीत पंचायत व भोगवटा करणारा इसम यामध्ये एक कबूलायत करण्यात आली पाहिजे आणि पंचायतींनी अशी कबूलायत पुढील कागदपत्रांसह ती करण्यात आल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत मुख्य कार्यकारी अधिका-यास सादर केली आहे कां याची शहानिशा करावी. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी अशी कबूलायत त्यांना प्राप्त झाल्यावर २ महिन्यांच्या आत जिल्हा परिषदेच्या स्थायी समितीच्या शे-यासह विभागीय आयुक्तांकडे पाठविण्याची दक्षता घेतली पाहिजे. त्याचप्रमाणे विभागीय आयुक्तांनी अशा प्रकरणात १५ दिवसांच्या आत याबाबत निर्णय घेतला पाहिजे. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या अधिपत्याखालील ग्रामपंचायतीच्या हद्दीतील कारखान्यांची यादी तयार करुन प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत खालील तक्त्यातील माहिती शासनास पाठविण्याची खबरदारी घ्यावी

| अ.क्र. | ग्रामपंचायतीचे नाव | कारखान्याचे नाव | ठोक करार केल्याचा दिनांक | विभागीय आयुक्तांची मान्यता घेतल्याचा दिनांक | मान्यता घेतली नसल्यास त्याची कारणे |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

ज्या कारखान्यांनी साठ दिवसांच्या आत कारखान्याचे बांधकाम व मोकळया जागेबाबत संबंधित ग्रामपंचायतीस कळविले नसेल, अशा कारखान्यांनी ज्या प्राधिकरणाकडून बांधकाम परवानगी घेतली आहे. त्या प्राधिकरणाकडून बांधकामाबाबतची कागदपत्रे ग्रामपंचायतीनी उपलब्ध करुन घ्यावीत व त्या

आधारे संबंधित कारखान्यांवर कराची आकारणी नियमानुसार करुन विहित वेळेत मागणी बिलाची नोटीस संबंधित कारखान्यावर बजावावी. विहित वेळेत कराचा भरणा कारखान्यांनी न केल्यास महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमाच्या कलम १२९ अन्वये तात्काळ कार्यवाही करावी.

ज्या ग्रामपंचायतींनी उपरोक्त नमूद बाबींची पूर्तता केलेली नसेल अशा ग्रामपंचायतींवर, त्या ग्रामपंचायतीच्या सरपंचावर, ग्रामसेवकावर व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांचेवर कार्यवाही करुन त्याबाबतचा अहवाल शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत पाठविण्यात यावा. तसेच असेही नमूद करण्यात येते की, या संदर्भात शासन स्तरावरुन आवश्यकता भासल्यास कोणत्याही ग्रामपंचायतीला अचानक भेट देऊन संबंधित ग्रामपंचायतीच्या अभिलेखाची तपासणी केव्हाही करण्यात येईल व या संदर्भात जी ग्रामपंचायत दोषी आढळून येईल त्या ग्रामपंचायतीवर तसेच संबंधितांवर नमूद केल्याप्रमाणे कारवाई करण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२५१५५८३१५७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Krishna Mukund Koyande

Digitally signed by Krishna Mukund Koyande
DN: CN = Krishna Mukund Koyande, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am the author of this document
Date: 2014.09.04 16:07:40 +05'30'

**( कृष्णा कोयंडे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव
५. विभागीय आयुक्त सर्व
६. जिल्हाधिकारी सर्व
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
८. ग्रामविकास विभागातील सर्व कार्यासने
९. निवड नस्ती पंरा-४.